राज्यस्तरीय विक्रीकर सल्लागार समितीची नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्रमांक-विसस-२२९३/प्र.१३९/कराधान-१.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १५ जून १९९४.

पहा:- १] शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एसएससी-१०८७/प्र.क्र.२५/ कराधान-१, दिनांक १८ फेब्रुवारी १९८७.

२] शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-एसएससी-१०८८/प्र.क्र.१२६/ कराधान-१, दिनांक १ सप्टेंबर १९९०.

## शासन निर्णय

राज्य शासनाने मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९ च्या केंद्रिय विक्रीकर अधिनियम, १९५६ या सारखे सुमारे १0 निरनिराळे अधिनियम, अंमलबजावणीसाठी विक्रीकर विभागाकडे सोपविलेले आहेत. या कर अधिनियमाच्या अंमलबजावणी आणि प्रशासनाच्या संदर्भात या निरनिराळ्या समस्या आणि अडचणी निर्माण होतात. तत्संबंधी विचारविमर्श करुन शासनाला सल्ला देण्यासाठी/शिफारस करण्यासाठी राज्य स्तरीय विक्रीकर सल्लागार समितीची नियुक्ती करण्यात येते. या समितीमध्ये निरनिराळ्या व्यापारी संघटनेचे प्रतिनिधी, शासकीय अधिकारी आणि विक्रीकर विभागाचे प्रतिनिधी यांचा समावेश करण्यात येतो. यापूर्वी नियुक्त केलेल्या विक्रीकर सल्लागार समितीचा कालावधी दिनांक ३१ ऑगस्ट, १९९२ रोजी संपुष्टात आला आहे. तदनंतर नवीन सल्लागार समिती नियुक्त करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात काही तांत्रिक आणि प्रशासकीय अडचणींचा काळजीपूर्वक विचार केल्यानंतर शासन असा आदेश देत आहे की, खालील नमूद केल्याप्रमाणे अध्यक्ष आणि सदस्य असलेल्या नवीन विक्रीकर सल्लागार समितीची नियुक्ती करण्यात यावी.

| | |
|---|---|
| [१] मा. वित्तमंत्री | समितीचे अध्यक्ष |
| [२] प्रधान सचिव [वित्त] | सदस्य |
| [३] प्रधान सचिव [ले.व.को.] | -"- |
| [४] विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य. | -"- |
| [५] इंडियन मर्चंट चेंबर, मुंबईचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव] | -"- |
| [६] महाराष्ट्र चेंबर्स ऑफ कॉमर्स, मुंबईचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव] | -"- |
| [७] फेडरेशन ऑफ असोसिएशन ऑफ महाराष्ट्राचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव] | -"- |

[८] मराठा चेंबर्स ऑफ कॉमर्स इंडस्ट्रीज पुणेचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव] — सदस्य

[९] महाविदर्भ चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्रीज नागपूरचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[१०]बॉम्बे चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्रीज, मुंबईचे प्रतिनिधी, [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[११]ऑल इंडिया मॅन्युफॅक्चरर्स ऑर्गनायझेशन, मुंबईचे प्रतिनिधी, [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[१२] मराठवाडा चेंबर्स कॉमर्स मुंबईचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[१३]फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्रिज, नवी दिल्लीचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[१४]ऑल इंडिया असोसिएशन ऑफ इंडस्ट्रिज मुंबईचे प्रतिनिधी [अध्यक्ष अथवा सचिव ] — -"-

[१५]ग्राहक संरक्षण आणि मार्गदर्शन संस्था, मुंबईचे प्रतिनिधी. — -"-

[१६]श्री. सुरेश केसवानी, अध्यक्ष भारत सिन्थेटिक्स, मुंबई. — -"-

[१७]श्री. एस. आर. धेडीया, सनदी लेखापाल, मुंबई. — -"-

[१८]श्री. बी. एस. शेवाळे, सनदी लेखापाल, मुंबई. — -"-

[१९]अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. — सदस्य सचिव.

सल्लागार समितीचे कार्ये:- या शासन निर्णयानुसार नियुक्त केलेल्या सल्लागार समितीच्या नावाप्रमाणेच ज्या समितीचे कार्य शासनाला सल्ला देणे अथवा शिफारस करणे अशा प्रकारचे असल्यामुळे सदर समितीने खाली नमूद केलेल्या बाबीपुरताच विचारविमर्ष अथवा चर्चा करुन तत्संबंधी शासनाला अथवा विक्रीकर आयुक्तांना सल्ला द्यावा अथवा शिफारस करावी.

[१] मुंबई विक्रीकर अधिनियम १९५९ केंद्रिय विक्रीकर अधिनियम, १९५९ यासहीत विक्रीकर विभागाकडे शासनाने सोपविलेल्या सर्व कर अधिनियमाच्या प्रशासन अंमलबजावणीच्या संदर्भात निदर्शनास आलेल्या कायदेशीर त्रुटी, दोष अथवा कार्यपध्दती विषयक उणिवा.

[२] निरनिराळ्या कर अधिनियमांच्याबाबतीत निदर्शनास येत असलेली कर चुकवेगिरीची समस्या आणि त्यासाठी करावयाची सुयोग्य उपाययोजना.

[३] कर अधिनियमाची अंमलबजावणी आणि प्रशासन या संदर्भातील सुसूत्रता आणि सुलभता आणण्यासाठी करावयाच्या उपाययोजना.

[४] कर अधिनियमाच्या संदर्भात शासनाने अथवा विक्रीकर आयुक्ताने विनिर्दिष्टपणे सोपविलेला कोणताही इतर विषय.

२. समितीने विचारविमर्ष अथवा सल्लामसलत ज्याबाबतीत करावयाची नाही ते कार्य विषय :

[१] विक्रीकर विभाग, आणि महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण याची अंतर्गत प्रशासकीय यंत्रणा.

[२] कर निर्धारणा पुनःर्निधारणा अपील अथवा सुधारणा यासंबंधीच्या व्यापा-याच्या वैयक्तिक प्रकरणातील आदेश.

[३] विक्रीकर अधिकारी आणि विक्रीकर न्यायाधिकरणाचे सदस्य यांची वैयक्तिक कार्यवाही करणे.

[४] कर अधिनियमाच्या अनुसूचीमधील नोंदीचा अन्वयार्थ लावणे, विशिष्ट मालावरील कराचा दर काय असावा हे ठरविणे इत्यादि.

३. या सल्लागार समितीच्या बैठकीच्या वेळी संबंधित सदस्यांमध्ये विचारविमर्ष अथवा चर्चा करताना कोणताही वादग्रस्त मुद्दा उद्भवल्यास समितीच्या अध्यक्षांचा तत्संबंधीचा निर्णय हा अंतिम असेल.

४. समितीचा दर्जा हा राज्यस्तरीय समितीचा असेल. अशासकीय सदस्यांचा प्रवासभत्ता व दैनिक भत्ता, मुंबई नागरी सेवा नियम खंड २ मधील परिशिष्ट ४२ [अ] यातील सेक्शन १ मधील १[१][बी] च्या तरतुदीनुसार व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-टीआरए-१४७७/१०३२/सी/एसईआर-५, दिनांक २३.९.१९७७ व क्र. टीआरए-१०८३/१४२६/एसईआर-५, दिनांक १.२.१९८४ च्या आधारे नियमित केला जावा. या नियमांच्या तरतूदी केवळ रेल्वे/सडक प्रवासासाठी लागू असल्यामुळे तसेच शासनाच्या काटकसरीच्या धोरणानुसार प्रथम श्रेणीच्या शासकीय अधिका-यांना विमान प्रवास करण्यावर बंदी असल्यामुळे, अशासकीय सदस्यांना विमान प्रवास तसेच रेल्वेच्या वातानुकूलीत प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय असणार नाही, व तसेच समितीवरील अशासकीय सदस्यांचा प्रवास भत्त्याच्या देयकाच्या बाबतीत समितीचे सदस्य सचिव हे नियंत्रण अधिकारी म्हणून कार्य करतील. समितीचे मुख्यालय मुंबई येथे राहील.

या सल्लागार समितीचा कार्य कालावधी समितीच्या नियुक्तीपासून २ वर्षाचा राहील.

५. समितीच्या बैठका तसेच अशासकीय ~~सदस्~~ सदस्यांचा प्रवास खर्च इत्यादिसाठी उद्भवणारा खर्च "२०४०-विक्रीकर-अ-संचालन आणि प्रशासन [१] विक्रीकर आयुक्त" या अर्थसंकल्पीय शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि चालू अर्थसंकल्पीय वर्षासाठी मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

दिलीप दीक्षित

[ दी.श्री. दीक्षित ]
विशेष कार्य अधिकारी,
वित्त विभाग.

प्रत माहितीकरिता,

१. समितीचे सर्व सदस्य.
२. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई-४०००१०.
३. सर्व अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई/पुणे/नागपूर विभाग.
४. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई.
५. मुंख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. अध्यक्ष, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, मुंबई.
७. वित्तमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
८. वित्तराज्यमंत्र्यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
९. सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-एक, मुंबई.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-दोन, नागपूर.
१३. लेखा व अधिदान अधिकारी, मुंबई.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी.
१५. कार्यासने- कराधान-२, कराधान-३,, कराधान-४, प्रशासन-४, प्रशासन-८, सेवा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२.
१६. निवड नस्ती, कराधान-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.